सुरक्षा रक्षक / माथाडी मंडळामधील खरेदी प्रक्रिया
संबंधित कार्यपध्दतीमध्ये बदल करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
शासन आदेश क्र. युडब्ल्युए-२०१४/प्र.क्र.५८३/कामगार-५
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २६/०७/२०१८.

वाचा : १) शासन आदेश क्रमांक: एसजीए-१५०९/प्र.क्र.१७५८/कामगार-५, दि.२५/०१/२०१०,
२) शासन आदेश क्रमांक:युडब्ल्युए-२०१४/प्र.क्र.५८३/कामगार-५,दि.०४/१२/२०१४
३) शासन आदेश क्रमांक: युडब्ल्युए-२०१४/प्र.क्र.५८३/कामगार-५,दि.११/०९/२०१७
४) शासन आदेश क्रमांक: युडब्ल्युए-२०१४/प्र.क्र.५८३/कामगार-५,दि.०७/११/२०१७
५) शासन पत्र क्रमांक : युडब्ल्युए-२०१८/प्र.क्र.९५/कामगार-५, दि.१०/०४/२०१८

आदेश

महाराष्ट्र माथाडी हमाल व इतर श्रमजीवी कामगार ( नोकरीचे नियमन व कल्याण ) अधिनियम, १९६९ अंतर्गत राज्यात एकूण ३६ माथाडी मंडळे व महाराष्ट्र खाजगी सुरक्षा रक्षक ( नोकरीचे नियमन व कल्याण ) अधिनियम, १९८१ अंतर्गत राज्यात एकूण १५ सुरक्षा रक्षक मंडळांची स्थापना करण्यात आलेली आहे.

२. माथाडी व सुरक्षा रक्षक मंडळांनी, प्रशासकीय प्रयोजनांव्यतिरिक्त काही आवश्यक खरेदी करावयाची झाल्यास, तसेच आर्थिक बाबींशी संबंधित कार्यवाही करण्यासंदर्भातील निर्देश दि.०७/११/२०१७ रोजीच्या शासन आदेशान्वये देण्यात आलेले आहेत.

३. माथाडी/ सुरक्षा रक्षक मंडळाच्या कामकाजामध्ये प्रशासकीय सुधारणा, इ. महाराष्ट्र माथाडी हमाल व इतर श्रमजीवी कामगार ( नोकरीचे नियमन व कल्याण ) अधिनियम, १९६९ कलम २३ व महाराष्ट्र खाजगी सुरक्षा रक्षक (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम, १९८१ कलम २४ नुसार विकास आयुक्त यांच्या एकसदस्यीय चौकशी समितीमार्फत चौकशी करण्याबाबत शासनाने निर्णय घेतला आहे. त्यानुसार संदर्भाधीन अ.क्र.५ येथील शासन पत्रान्वये विकास आयुक्त यांना कळविण्यात आले असून, त्यानुसार सदर समितीची चौकशी अहवाल शासनास सादर केल्यानंतर सदर अहवालासंदर्भात आवश्यक तो निर्णय घेण्यात येणार आहे. तथापि, त्या दरम्यान आर्थिक बाबी विषयी सर्वतोपरी समुचित निर्णय घेण्याच्या दृष्टीने,माथाडी / सुरक्षा रक्षक मंडळातील वैधानिक कामकाज, मंडळातील कर्मचारी/ अधिकारी व माथाडी कामगार/ सुरक्षा रक्षक यांच्या वेतन व अनुषंगिक भत्ते इ. बाबी वगळता मंडळाच्या प्रशासकीय, कार्यालयीन खर्च, लेव्हीचा दर/ विगतवारी निश्चित करणे, बँकठेवी इ. बाबत निर्णय घेण्यासाठी दि. ०७/१२/२०१७ अन्वये निश्चित केलेल्या (अ) मधील नमूद कार्यपध्दतीमध्ये बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालील प्रमाणे आदेश देण्यात येत आहेत :-

अ) कामगार आयुक्त यांच्या अध्यक्षतेखाली सर्व माथाडी / सुरक्षा रक्षक मंडळाचे अध्यक्ष यांची मिळून समिती गठीत करण्यात यावी. सदर समितीने उक्त मंडळाचा प्रशासकीय, कार्यालयीन खर्च संगणकीय दुरुस्ती, देखभाल इ. बाबत दर १५ दिवसानी बैठक घेऊन नियमानुसार प्रशासकीय मान्यता घेणे बंधनकारक राहिल. प्रशासकीय मान्यतेनुसार प्रत्येक माथाडी / सुरक्षा रक्षक मंडळाने दैनंदिन प्रशासकीय, कार्यालयीन खर्च इ. बाबत प्रचलित कार्यालयीन खर्चाचे नियम, अधिनियम/ योजना इ. मधील तरतूदीचा स्पष्ट उल्लेख करुन प्रशासकीय आदेश काढणे बंधनकारक राहील. अशा प्रकारे मंडळानी निर्गमित केलेले सर्व प्रशासकीय आदेश वेळोवेळी शासनाकडे माहितीस्तव सादर करावेत.

दि. ०७/११/२०१७ रोजीच्या शासन आदेशामधील (ब), (क) व (ड) यामधील सूचना यापुढेही लागू राहतील.

४. सदरहू आदेश महाराष्ट्र माथाडी हमाल व इतर श्रमजीवी कामगार ( नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम, १९६९ च्या ७(४), तसेच महाराष्ट्र खाजगी सुरक्षा रक्षक ( नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम, १९८१ च्या कलम ८(४) अन्वये शासनास असलेल्या प्राधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदरहू आदेशाचे काटेकोरपणे पालन होईल याची दक्षता कामगार आयुक्त व सर्व संबंधितांनी घ्यावी.

६. सदरहू आदेश निर्गमित केल्या दिनांकापासून तात्काळ अंमलात येतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०१८०७२६१७२२२२८९१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Shashank M. Sathe
Date: 2018.07.27 14:44:31 +05'30'

( श. मा. साठे )
उप सचिव ( कामगार)

**प्रत:-**

१) कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) सह आयुक्त कामगार, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) अध्यक्ष, सर्व माथाडी मंडळे.
४) अध्यक्ष, सर्व सुरक्षा रक्षक मंडळे.
५) निवड नस्ती ( कामगार-५)